मा. उच्च न्यायालय,मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथील रिट याचिका क्र.१५२२१/२०१७ व ७४२६/२०१९ मधील दिनांक ०४/०७/२०१९ चे सामाईक न्यायनिर्णयानुसार नागपूर समभागातील जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी नागपूर,भंडारा,वर्धा,गडचिरोली,गोंदिया व चंद्रपूर यांचे अधिनस्त प्रक्षेत्रावरील एकूण ५९ मजुरांची ग्रेड-१ मजूर पदावर नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायप्र-२०२४/ प्र.क्र.५४/१३ अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ०७ मे, २०२४.

**वाचा :-** १) मा. औद्योगिक न्यायालय, जालना येथे दाखल तक्रार युएलपी क्र.१०/२०१३ मध्ये दिनांक १०.२.२०१७ चा न्याय निर्णय.

२) मा.औद्योगिक न्यायालय, लातूर येथे दाखल तक्रार युएलपी क्र.२५/२०१७ मध्ये दिनांक २६.९.२०१८ चा न्याय निर्णय

३) मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.१५२२१/२०१७ व ७४२६/२०१९ मध्ये दिनांक ४.७.२०१९ रोजी झालेला सामाईक न्याय निर्णय.

४) मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर येथे दाखल रिट पि. क्र.३६०१/२०२२ मध्ये मा. न्यायालयाने दिनांक १०.२.२०२३ रोजी दिलेला न्याय निर्णय.

५) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. अेपीटी-१०२४/११७८०/रो.मजूर/प्रस्ताव/प्र.क्र.१९०/ आस्था-३/११७२२, दिनांक १९.०४.२०२४ चे पत्र.

**प्रस्तावना :-** मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथील रिट क्र.१५२२१/२०१७ व ७४२६/२०१९ मधील मा. उच्च न्यायालयाच्या दि. ०४/०७/२०१९ चे न्यायनिर्णयानुसार नागपूर संभागातील जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, नागपूर,भंडारा,वर्धा,गडचिरोली,गोदिया व चंद्रपूर यांचे अधिनस्त प्रक्षेत्रावरील एकूण ११८ मजुरांनी २४० दिवस किंवा अधिक कालावधीचे कामकाज केले आहे. मा. न्यायालयीन आधारभूत दस्त तपासून त्यातील ५९ मजुरांची ग्रेड-१ मजूर पदावर नियुक्तीसाठी शिफारस करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

१. विभागीय कृषी सहसंचालक, लातूर विभाग लातूर यांचे अधिनस्त जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, नांदेड यांचे स्तरावरील ५७ रोजंदारी मजुरांचे प्रकरणी शेतकरी शेतमजूर पंचायत (महाराष्ट्र) या संघटनेने विषयांकित तक्रार यु.एल.पी.क्र.१०/२०१३ मा. औद्योगिक न्यायालय, जालना येथे दाखल केली होती. सदर प्रकरणात मा. न्यायालयाने दि.१०/०२/२०१७ रोजी प्रकरणातील एकूण ५७ पैकी ३ मजुरांचे कामाचे दिवस २४० दिवसांपेक्षा कमी असल्याने त्यांना वगळून प्रक्षेत्रावरील प्रकरणाशी संबंधित उर्वरित ५४ रोजंदारी मजुरांना शासकीय सेवेत सामावून घेण्यात यावे, असा निकाल दिला आहे. त्याविरोधात शासनाच्या वतीने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.१५२२१/२०१७ दाखल करण्यात आली होती.

२. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, उस्मानाबाद यांचे स्तरावरील यु.एल.पी.क्र.२५/२०१७ या प्रकरणात मा. औद्योगिक न्यायालय, लातूर यांनी दि.२६/०१/२०१८ रोजी निकाल देत प्रकरणातील ६ रोजंदारी मजुरांना पूर्वलक्षी प्रभावाने लाभ अदा करण्यात यावेत व सदर मजुरांना मागणी केल्याप्रमाणे

शासकीय सेवेत सामावून घेण्यात यावे, असे आदेशित केले होते. त्यानुसार दोन्ही प्रकरणांत साधर्म्य असल्याने शासन स्तरावरुन सदर प्रकरणात मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.७४२६/२०१९ दाखल करण्यात आली होती.

३. मा. उच्च न्यायालयाने रिट पिटिशन क्र.१५२२१/२०१७ व रिट पिटिशन क्र.७४२६/२०१९ या प्रकरणात साधर्म्य असल्याने व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, उस्मानाबाद यांचे स्तरावरील पूर्वीच्या तक्रार यु.एल.पी.क्र.८०/२०१५ मधील रिट याचिका क्र.१०४९७/२०१८ मधील दि.०६/१०/२०१८ रोजीच्या निकालाच्या धर्तीवर एकत्र सुनावणीस घेण्यात येऊन दि. ०४/०७/२०१९ रोजी संयुक्त निकाल देत काही मुद्दे उपस्थित करून, प्रस्तुत प्रकरणातील मजुरांना व अशा इतर सर्व मजुरांचा सेवा कालावधी व त्यांची सेवा ज्येष्ठता विचारात घेऊन पात्र मजुरांना कायम करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करणे बाबत निर्देशित केले.

४. मा. उच्च न्यायालयाच्या दि. ०४/०७/२०१९ च्या न्यायनिर्णयानुसार कार्यवाही अनुसरताना संबंधित मजुरांच्या सेवाजेष्ठता याद्या तयार करण्यास सुरुवात केली असता, प्रक्षेत्रावरील कार्यालयात पुरेसे मनुष्यबळ उपलब्ध नसल्याने व त्यासंबंधी उपलब्ध असलेली दस्त व अभिलेखे फार जुनी व जीर्ण झालेली असल्याने ते तपासून माहिती संकलित करण्यासाठी अधिनस्त कार्यालयांना अनेक समस्यांना सामोरे जावे लागले आहे व त्याकरिता बराचसा कालावधी लागलेला आहे. सदर प्रकरणात कार्यवाही सुरु असताना मध्यंतरीच्या कालावधीत राज्यात विधानसभा निवडणूक कार्यक्रम जाहीर झाल्याने त्याकरिता उपलब्ध मनुष्यबळ निवडणूक प्रक्रियेत गुंतल्यामुळे प्रकरणी मुदतवाढ घेण्यासाठी व प्रकरणातील सर्व वास्तविकता मा. उच्च न्यायालयाचे सविनय निदर्शनास आणून देण्यासाठी सरकारी वकिलांचे सल्ल्याने संबंधित जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी नांदेड यांचे स्तरावरून सिव्हील ॲप्लिकेशन क्र.२५६५/२०२० अन्वये मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल करण्यात आले होते. सदर प्रकरणात मा. उच्च न्यायालयाने प्रतिवादी यांचे म्हणणे ऐकून घेत वास्तविकतेच्या आधारावर अंशतः मान्यता प्रदान करत दि. ३१/०३/२०२० अखेर पर्यंत सदर रिट पिटिशनमधील आदेशाची अंमलबजावणी करण्याचे आदेशित केले होते.

५. दरम्यानच्या कालावधीत, मा. उच्च न्यायालयाच्या दि.०४/०७/२०१९ चे न्यायनिर्णयाची अंमलबजावणी विहीत मुदतीत न झाल्याने प्रकरणातील मजूर अर्जदारांच्या संघटनेच्या वतीने मा. उच्च न्यायालयात अवमान याचिका क्र.३३३/२०२० दाखल करण्यात आली आहे. सदर अवमान याचिकेत प्रतिवादी यांची व शासनाची भूमिका विषद करुन प्रक्षेत्रावरील उपलब्ध दस्त व अभिलेखांवरून व जाहीर प्रकटन दिल्यानंतर संकलित करण्यात येत असलेली माहिती सर्वांना ज्ञात झाली व त्यामुळे भविष्यात कोणी याबाबत आक्षेप घेणार नाही आणि आक्षेप घेतलाच तर तो निरर्थक होईल. तद्नंतर, उक्त नमूद केलेनुसार उपलब्ध दस्त व अभिलेखे यांची पडताळणी करुन ज्या मजुरांचे वयाचे पुरावे उपलब्ध होऊ शकले नाहीत त्यांचे बाबत वयाची निश्चिती हि शारिरीक वैद्यकीय तपासणी करुन, मा. जिल्हा शल्यचिकित्सक, यांचे द्वारे करण्यात आलेली असून सदर माहिती प्रमाणित करण्यात आलेली आहे व मजुरांची वैद्यकीय तपासणी करुन त्यांचे अंदाजे वय निश्चित केलेनुसार वयाचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्यात आलेले आहेत व ज्या मजूरांचा जन्म दिनांक अवगत झाला नाही अशा मजुरांचा जन्म दिनांक हा १ जुलै असा मानीव गृहित धरला आहे. सदर प्रचलित नियम व तरतूद महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ मधील नियम क्रमांक ३८ (२) (बी) व (ई) मधील तरतूदीनुसार निश्चित करण्यात आलेला आहे.

नागपूर संभागातील जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी नागपूर,भंडारा,वर्धा,गडचिरोली,गोदिया व चंद्रपूर यांचे अधिनस्त एकूण ५१ प्रक्षेत्र असून त्यातील उपलब्ध दस्त व अभिलेखांवरुन प्रक्षेत्रावरील मजुरांच्या कामाच्या दिवसांचा कमी/अधिक (२४० दिवसांपेक्षा) कालावधी विचारात न घेता सर्व रोजंदारी मजुरांचा समावेश करुन मजुरांच्या केवळ नियुक्ती दिनांकापासून ज्येष्ठता सूचीचे प्रपत्र-१ तयार करण्यात आले आहे. प्रपत्र-१ नुसार एकूण मजुरांची संख्या १६४०७ असल्याचे पडताळणी अंती आढळून आले आहे.

| प्रपत्र-१ | | |
|---|---|---|
| अ.क्र. | जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी | एकूण मजुरांची संख्या |
| १. | नागपूर | ३३२३ |
| २. | भंडारा | ३३४८ |
| ३. | वर्धा | २७२९ |
| ४. | गडचिरोली | २३२१ |
| ५. | गोदिया | २४५३ |
| ६. | चंद्रपूर | २२३३ |
| | **एकूण** | **१६४०७** |

मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथील रिट क्र.१५२२१/२०१७ व ७४२६/२०१९ मधील मा. उच्च न्यायालयाच्या दि. ०४/०७/२०१९ चे न्यायनिर्णयानुसार जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, नागपूर,भंडारा,वर्धा,गडचिरोली,गोदिया व चंद्रपूर यांचे अधिनस्त प्रक्षेत्रावरील एकूण ११८ मजुरांनी २४० दिवस किंवा अधिक कालावधीचे कामकाज केले आहे त्यातील मा. न्यायालयीन आधारभूत दस्त तपासून ५९ मजुरांची ग्रेड-१ मजूर पदावर नियुक्तीसाठी शिफारस करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथील रिट क्र.१५२२१/२०१७ व ७४२६/२०१९ मधील मा. उच्च न्यायालयाच्या दि. ०४/०७/२०१९ चे न्यायनिर्णयानुसार जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, नागपूर,भंडारा,वर्धा,गडचिरोली,गोदिया व चंद्रपूर यांचे अधिनस्त प्रक्षेत्रावरील एकूण ११८ मजुरांनी २४० दिवस किंवा अधिक कालावधीचे कामकाज केले आहे. त्यातील मा. न्यायालयीन आधारभूत दस्त तपासून ५९ मजुरांची ग्रेड-१ मजूर पदावर नियुक्तीस तसेच जेष्ठता यादीतील उर्वरित पात्र रोजंदारी मजूरांना भविष्यात होणाऱ्या संभाव्य रिक्त पदी सामावून घेणेबाबत शासन मान्यता देण्यात येत आहे. **जिल्हा निहाय मजूरांच्या नियुक्तीचे विवरणपत्र शासन निर्णयासोबतच्या " प्रपत्र-अ "** मध्ये नमूद करण्यात आलेले आहे.

२. **नागपूर संभागातील जिल्हानिहाय पात्र मजुरांचा गोषवारा**

(अ) <u>जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी, नागपूर</u>

जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी नागपूर यांचे अधिनस्त १२ प्रक्षेत्र असुन त्यातील उपलब्ध सर्व दस्त व अभिलेखांवरुन एकूण मजूरांची संख्या ३३२३ आहे. त्यातील उपलब्ध सर्व दस्तऐवजांवरुन प्रपत्र -२ नुसार ज्या मजुरांचे कामकाजाचे दिवस २४० किंवा त्यापेक्षा अधिक आहेत अशा मजुरांची संख्या २२४ आढळून आलेली आहे. **इतर निकष पुर्ण करून ग्रेड-१ मजूर पदावर नियुक्तीकरीता पात्र असलेल्या मजुरांची संख्या २० आहे.**

(ब) <u>जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, भंडारा</u>

जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, भंडारा यांचे अधिनस्त ६ प्रक्षेत्र असून त्यातील उपलब्ध सर्व दस्त व अभिलेखांवरुन एकूण मजूरांची संख्या ३३४८ आहे. त्यातील उपलब्ध सर्व दस्तऐवजांवरुन प्रपत्र-२ नुसार ज्या मजुरांचे कामकाजाचे दिवस २४० किंवा त्यापेक्षा अधिक आहेत, अशा मजुरांची संख्या १२० आहे. त्यापैकी **इतर निकष पूर्ण करुन ग्रेड-१ मजूर पदावर नियुक्तीसाठी पात्र ठरणाऱ्या एकूण मजूरांची संख्या ०८ आहे.**

(क) <u>जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, वर्धा</u>

जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, वर्धा यांचे अधिनस्त १३ प्रक्षेत्र असून त्यातील उपलब्ध सर्व दस्त व अभिलेखांवरुन एकूण मजूरांची संख्या २७२९ आहे. त्यातील उपलब्ध सर्व दस्तऐवजांवरुन प्रपत्र-२ नुसार ज्या मजुरांचे कामकाजाचे दिवस २४० किंवा त्यापेक्षा अधिक आहेत, अशा मजुरांची संख्या १३८ आहे. त्यापैकी **इतर निकष पूर्ण करुन ग्रेड-१ मजूर पदावर नियुक्तीसाठी पात्र ठरणाऱ्या एकूण मजूरांची संख्या ०९ आहे.**

(ड) <u>जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, गडचिरोली</u>

जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, गडचिरोली यांचे अधिनस्त ६ प्रक्षेत्र असून त्यातील उपलब्ध सर्व दस्त व अभिलेखांवरुन एकूण मजूरांची संख्या २३२१ आहे. त्यातील उपलब्ध सर्व दस्तऐवजांवरुन प्रपत्र-२ नुसार ज्या मजुरांचे कामकाजाचे दिवस २४० किंवा त्यापेक्षा अधिक आहेत, अशा मजुरांची संख्या ८५ आहे. त्यापैकी **इतर निकष पूर्ण करुन ग्रेड-१ मजूर पदावर नियुक्तीसाठी पात्र ठरणाऱ्या एकूण मजूरांची संख्या ११ आहे. परंतू शुध्द १ पद रिक्त असल्याने १ मजूर नियुक्तीसाठी शिफारस केली आहे.**

(इ) <u>जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, गोंदिया</u>

जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, गोंदिया यांचे अधिनस्त ५ प्रक्षेत्र असून त्यातील उपलब्ध सर्व दस्त व अभिलेखांवरुन एकूण मजूरांची संख्या २४५३ आहे. त्यातील उपलब्ध सर्व दस्तऐवजांवरुन प्रपत्र-२ नुसार ज्या मजुरांचे कामकाजाचे दिवस २४० किंवा त्यापेक्षा अधिक आहेत, अशा मजुरांची संख्या ७६ आहे. त्यापैकी **इतर निकष पूर्ण करुन ग्रेड-१ मजूर पदावर नियुक्तीसाठी पात्र ठरणाऱ्या एकूण मजूरांची संख्या ०९ आहे.**

(ई) <u>जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, चंद्रपूर</u>

जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, चंद्रपूर यांचे अधिनस्त ९ प्रक्षेत्र असून त्यातील उपलब्ध सर्व दस्त व अभिलेखांवरुन एकूण मजूरांची संख्या २२३३ आहे. त्यातील उपलब्ध सर्व दस्तऐवजांवरुन प्रपत्र-२ नुसार ज्या मजुरांचे कामकाजाचे दिवस २४० किंवा त्यापेक्षा अधिक आहेत, अशा मजुरांची संख्या ११५ आहे. त्यापैकी **इतर निकष पूर्ण करुन ग्रेड-१ मजूर पदावर नियुक्तीसाठी पात्र ठरणाऱ्या एकूण मजूरांची संख्या १२ आहे.**

३. सदर नागपूर संभागातील मजुरांचा एकत्रित जिल्हानिहाय गोषवारा खालीलप्रमाणे

**- गोषवारा -**

| अ.क्र | जिल्हा अधक्षक कृषि अधिकारी | प्रक्षेत्र संख्या | प्रपत्र-१ नुसार मजूर संख्या | प्रपत्र-१ नुसार २४० दिवस काम केलेले एकूण मजूर संख्या | प्रपत्र-१ नुसार २४० दिवस काम केलेले परंतु नियुक्तीस अपात्र असलेले मजूर संख्या | सर्व निकष पूर्ण करुन नियुक्तीस पात्र असलेले मजूरांची संख्या | ग्रेड वन मजुरांची जिल्हा निहाय रिक्त पदसंख्या | प्रपत्र ३ नुसार नियुक्तीस पात्र मजूरांची संख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | नागपूर | १२ | ३३२३ | २२४ | २०४ | २० | २१ | २० |
| २ | भंडारा | ६ | ३३४८ | १२० | ९९ | २१ | ८ | ८ |
| ३ | वर्धा | १३ | २७२९ | १३८ | ११८ | २० | ९ | ९ |
| ४ | गडचिरोली | ६ | २३२१ | ८५ | ७० | ११ | १ | १ |
| ५ | गोंदिया | ५ | २४५३ | ७६ | ५६ | २० | ९ | ९ |
| ६ | चंद्रपूर | ९ | २२३३ | ११५ | ८९ | २६ | १२ | १२ |
| | **एकूण** | **५१** | **१६४०७** | **७५८** | **६३६** | **११८** | **६०** | **५९** |

४. न्यायालयीन प्रकरणात वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ दि.१७/४/२०१५ भाग पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार अ. क्र.२ नियम क्र. ७ मध्ये नमूद केल्या नुसार "न्यायालयाच्या अंतिम निर्णयानुसार किंवा न्यायालयीन निर्णयाबाबत पुनर्विलोकन अर्ज किंवा अपील करावयाचे सर्व मार्ग संपल्यास करावयाच्या प्रदानांबाबत प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पूर्ण अधिकार प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. आयुक्त (कृषी) कार्यालयाने मा. न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयानुसार नियुक्ती प्रदान करताना शासनाचे प्रचलित नियम, अटी व शर्ती व आदेशांचे अनुपालन करण्यात यावे. रोजदारी मजुरांना ग्रेड-१ पदावर नियुक्ती करताना त्यांना अदा करावयाच्या वेतन व भत्ते यांची अचूक परिगणना करण्यात यावी. या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय वा वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदरचा शासन निर्णय विधी व न्याय विभाग औरंगाबाद,अनौ.सं.क्र.५७/२०१९, दिनांक १९/३/२०१९ व अनौ.सं.क्र.२७४/२०२२, दिनांक १०/११/२०२२ रोजीच्या अभिप्रायास अनूसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५०७११४०२६५७०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2024.05.07 11:52:59 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर.
५) सह संचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन,मुंबई-३२.
७) विभागीय कृषि सह संचालक, नागपूर विभाग, नागपूर.
८) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, नागपूर,भंडारा,वर्धा,गडचिरोली,गोदिया व चंद्रपूर.
९) जिल्हा कोषगार अधिकारी, नागपूर,भंडारा,वर्धा,गडचिरोली,गोदिया व चंद्रपूर.
१०) निवड नस्ती-१३-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय. मुंबई-३२.

# विवरणपत्र "अ "

## शासन निर्णय क्रमांक : न्यायप्र-२०२४/प्र.क.५४/१३ अे, दिनांक ०७ मे, २०२४

## नियुक्तीसाठी पात्र ठरलेल्या ५९ मजुरांची यादी

### अ) जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, नागपूर

| पात्र मजुरांची यादी | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | प्रक्षेत्र | मजुराचे नांव | सेवाजेष्ठता क्रमांक |
| १ | जिल्हा मध्यवर्ती फरोवा, सुसुंद्री | प्रमीला लांडे | १०८ |
| २ | जिल्हा मध्यवर्ती फरोवा, सुसुंद्री | विमल कातडे | १३५ |
| ३ | जिल्हा मध्यवर्ती फरोवा, सुसुंद्री | आशा वामन आंबडकर | १९ |
| ४ | जिल्हा मध्यवर्ती फरोवा, सुसुंद्री | कांताबाई तागडे | १९३ |
| ५ | ताफरोवा, मारोडी | खुशाल किसन राणे | ४४८ |
| ६ | शाफरोवा, तिडंगी | मोरेश्वर संतोषराव महाजन | ४९२ |
| ७ | जिल्हा मध्यवर्ती फरोवा, सुसुंद्री | सुनिता ठाकरे | १२५ |
| ८ | जिल्हा मध्यवर्ती फरोवा, सुसुंद्री | पुष्पा काथवटे | ३१४ |
| ९ | जिल्हा मध्यवर्ती फरोवा, सुसुंद्री | दत्तात्रय ढगे | ६१२ |
| १० | जिल्हा मध्यवर्ती फरोवा, सुसुंद्री | विमल दहाट | ८९ |
| ११ | ताफरोवा, तिडंगी | चंद्रभान देवराव ठाकरे | ५९७ |
| १२ | जिल्हा मध्यवर्ती फरोवा, सुसुंद्री | रेखा काळे | ५७ |
| १३ | शाफरोवा, तिडंगी | प्रभा दामुजी घुगल | ६०० |
| १४ | ताफरोवा, मारोडी | युवराज लक्ष्मण भिवगडे | ५३३ |
| १५ | ताफरोवा, मारोडी | कचरु गोपीचंद लेंडे | ७९३ |
| १६ | ताफरोवा, हिवराबाजार | गणीराम शिवराम कुभरे | ११४४ |
| १७ | ताफरोवा, हिवराबाजार | शत्रुघ्न शिवराम कुंभलकर | ११२९ |
| १८ | ताफरोवा, हिवराबाजार | विजय सोमा कुंभलकर | ११३२ |
| १९ | ताफरोवा, तिडंगी | शिवराम बापुराव ढाले | १४८६ |
| २० | शाफरोवा, तिडंगी | माया टिलाराम घुधल | ७७९ |

### ब) जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, भंडारा :-

| पात्र मजुरांची यादी | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | प्रक्षेत्र | मजुराचे नांव | सेवाजेष्ठता क्रमांक |
| १ | ताफरोवा, आंधळगांव | आनंदराव गोविंदराव कारेमोरे | २३१ |
| २ | ताफरोवा, भंडारा | पंढरी पामाजी घोनमोडे | २५८ |
| ३ | ताफरोवा, आंधळगांव | वसंत सदाशिव गभणे | २३४ |
| ४ | ताफरोवा, भंडारा | परमेश्वर गोविंदा गाढवे | २६३ |
| ५ | ताफरोवा, आंधळगांव | रामेश्वर श्रीराम गभणे | २५० |
| ६ | ताफरोवा, आंधळगांव | गणेश राधेकिसन गभणे | ४७५ |
| ७ | ताबिके, डोंगरगांव | नरेंद्र झिठोबा मोहतुरे | ७०४ |
| ८ | ताबिके, डोंगरगांव | मदन गोविंदा श्रीरामे | ७४७ |

### क) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, वर्धा

| पात्र मजुरांची यादी | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | प्रक्षेत्र | मजुराचे नांव | सेवाजेष्ठता क्रमांक |
| १ | ताफरोवा, बोर | मालु मारोतराव ठाकरे | ३० |
| २ | ताफरोवा, तळेगांव | सुरेखा रामकृष्ण कोराटे | ५७ |
| ३ | ताफरोवा, तळेगांव | त्र्यंबक बापुराव भुयार | १८० |
| ४ | ताफरोवा, तळेगांव | हरिदास मारोतराव देवधरे | १९६ |
| ५ | ताफरोवा, तळेगांव | धनराज वैकुंठराव पाचधरे | २०७ |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | ताफरोवा, बोर | संजुय विष्णु निखाडे | २८३ |
| ७ | ताफरोवा, तळेगांव | गोपाल पुंडलिक भिसे | ४७८ |
| ८ | ताफरोवा, तळेगांव | सुरेश मारोतराव जाधव | ५४४ |
| ९ | ताफरोवा, तळेगांव | मंदा काशिनाथ होले | ५२७ |

## ड) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,गडचिरोली

| पात्र मजुरांची यादी | | | |
|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **प्रक्षेत्र** | **रोजंदारी मजूराचे नांव** | **सेवाजेष्ठता क्रमांक** |
| १ | ताफरोवा, वाकडी | श्री.गिरीधर मोहनप दरडमारे | ६५७ |

## इ) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, गोंदिया:-

| पात्र मजुरांची यादी | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | प्रक्षेत्र | मजुराचे नांव | सेवाजेष्ठता क्रमांक |
| १ | टिसीडी म्हाली | मधु बिहारी मुनेश्वर | ७२ |
| २ | टिसीडी म्हाली | दादुराम जोशी बावनथडे | ९७ |
| ३ | टिसीडी म्हाली | राजकुमार रामलाल लिल्हारे | ३६४ |
| ४ | टिसीडी म्हाली | श्यामराव तुळशीराम बावनथडे | १८७ |
| ५ | जिमफरोवा हिवरा | प्रदीप दादु नंदेश्वर | ३५५ |
| ६ | जिमफरोवा हिवरा | सुरजाबाई शिवचरण पिसोडे | ३९६ |
| ७ | जिमफरोवा हिवरा | कुवरलाल दुलीचंद नंदेश्वर | ७१७ |
| ८ | जिमफरोवा हिवरा | दुर्गाप्रसाद भरतलाल बसिने | ६३ |
| ९ | जिमफरोवा हिवरा | सुरेश रेवनाथ धमगाये | ६२८ |

## ई) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, चंद्रपूर:-

| पात्र मजुरांची यादी | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | प्रक्षेत्र | मजुराचे नांव | सेवाजेष्ठता क्रमांक |
| १ | ताफरोवा व्याहाड | पुरुषोत्तम जगन्नाथ चरडे | ५७३ |
| २ | ताफरोवा व्याहाड | प्रकाश सिताराम खेवले | ५७० |
| ३ | ताफरोवा व्याहाड | महेश्वर दवाजी गेडाम | ५८८ |
| ४ | ताफरोवा व्याहाड | बंडू पैका निखाडे | ६४६ |
| ५ | ताफरोवा व्याहाड | यशवदा नानु बांबोळे | ५२५ |
| ६ | ताफरोवा व्याहाड | रुषी शंकर मडावी | ५९१ |
| ७ | ताफरोवा व्याहाड | भक्तदास मारोती पोटे | ५९७ |
| ८ | ताफरोवा व्याहाड | उत्तरा सुधाकर शेडमाके | ५२६ |
| ९ | ताफरोवा व्याहाड | इश्वर सुकरु शेडमाके | ८४२ |
| १० | ताफरोवा व्याहाड | कांता गजानन गेडेकर | ६३५ |
| ११ | ताफरोवा व्याहाड/ताबीके देवाडा | शामराव पत्रु पेंदोर | १४२९ |
| १२ | ताफरोवा व्याहाड/ताबीके देवाडा | जिजाबाई रामचंद्र निकोडे | १४३७ |

---------------